**चांदा ते बांदा विकास योजनेंतर्गत सिंधुदूर्ग जिल्हयातील लाभार्थ्यांना दुग्ध उत्पादन व्यवसायासाठी प्रोत्साहित करणे, १० शेळया + ०१ बोकड असा शेळी गट वाटप करणे आणि जिल्हयातील महिला बचत गट सदस्यांसाठी कुक्कुट ग्राम योजना राबविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन आदेश क्रमांक- संकिर्ण-२०१८/प्र.क्र.८८/पदुम-४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- १३ डिसेंबर, २०१८.

वाचा : १. नियोजन विभाग शासन निर्णय क्र. डिएपी १०१५ / प्र.क्र.५१ / का.१४८१, दि.२१.०६.२०१६
२. नियोजन विभाग शासन निर्णय क्र. डिएपी १०१५ / प्र.क्र.५१ / का.१४८१, दि.०७.०७.२०१७
३. कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाचा शासन निर्णय क्र. राज्ययो- २०१२ / प्र.क्र.१५९ /पदुम -४, दि. ३०.१०.२०१५
४. कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाचा शासन निर्णय क्र. पविआ- २०११ / प्र.क्र.७४ / पदुम-३, दि. ०२.०७.२०११
५. कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाचा शासन निर्णय क्र. जिवायो- २०१० / प्र.क्र.३१२ / पदुम-४, दि. १६.०९.२०१०
६. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य पुणे यांचे कार्यालयीन पत्र क्र.एफवायपी / १८ (१९) / तां-१ / सीआर-३१/ /२०१८, पसं-६, पुणे, दि. १२.०९.२०१८ (विविध ३ पत्र)
७. नियोजन विभागाचे पत्र क्र.चांबांयो- २०१७ / प्र.क्र.१२५/ का.१४१८ दि.३०.११.२०१८ अन्वये, मा. राज्यमंत्री (वित्त व नियोजन) यांच्या अध्यक्षतेखाली दि.०५.०९.२०१८ व दि.०९.१०.२०१८ रोजी पार पडलेल्या बैठकीचे निर्गमित इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

मा. राज्यमंत्री (वित्त व नियोजन) यांच्या अध्यक्षतेखाली दि.०९.१०.२०१८ रोजी पार पडलेल्या राज्य स्तरीय समितीच्या बैठकीमध्ये चांदा ते बांदा विकास योजनेंतर्गत पशुसंवर्धन विभागामार्फत सिंधुदूर्ग जिल्हयातील लाभार्थ्यांना दुग्ध उत्पादन व्यवसायासाठी प्रोत्साहित करणे, १० शेळया + ०१ बोकड असा शेळी गट वाटप करणे आणि जिल्हयातील महिला बचत गट सदस्यांसाठी कुक्कुट ग्राम योजना राबविण्यास समितीने मान्यता प्रदान केलेली आहे.

संदर्भीय २ येथील दि.०७.०७.२०१७ च्या शासन निर्णयामधील पृ.क्र.३ वर अ.क्र. **३.२ -प्रशासकीय विभागाने करावयाची कार्यवाही** या अंतर्गत (अ) येथे राज्यस्तरीय समितीने मंजूर केलेल्या नवीन कामाना (नाविन्यपूर्ण कामांना) प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार जिल्हाधिकारी यांना तसेच तांत्रिक मान्यता देण्याचे अधिकार जिल्हास्तरावरील कार्यान्वयीन यंत्रणा प्रमुखांना योजनेच्या आदेशाव्दारे प्रदान करण्याची कार्यवाही संबंधित योजनेचा प्रशासकीय विभाग करेल असे नमुद करण्यात आलेले आहे. या आदेशात योजनेंतर्गत करावयाच्या कामांचा तपशील, लाभार्थी असल्यास लाभार्थी निवडीचे निकष इ. आवश्यक बाबी असतील असे नमुद असल्याने पशुसंवर्धन विभागामार्फत सिंधुदूर्ग जिल्हयात राबवावयाच्या दुग्ध उत्पादन व्यवसायासाठी प्रोत्साहित करणे, १० शेळया + ०१ बोकड असा शेळी गट वाटप करणे आणि जिल्हयातील महिला बचत गट सदस्यांसाठी

कुक्कुट ग्राम योजना यांना प्रशासकीय व तांत्रिक मंजूरी प्रदान करण्याच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे शासन आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन आदेश:-**

चांदा ते बांदा विकास योजनेंतर्गत पशुसंवर्धन विभागामार्फत सिंधुदूर्ग जिल्हयातील लाभार्थ्यांना दुग्ध उत्पादन व्यवसायासाठी प्रोत्साहित करणे, १० शेळया + ०१ बोकड असा शेळी गट वाटप करणे आणि जिल्हयातील महिला बचत गट सदस्यांसाठी कुक्कुट ग्राम योजना राबविण्याच्या अनुषंगाने या तीनही योजनांना जिल्हाधिकारी, सिंधुदूर्ग यांनी प्रशासकीय मान्यता तसेच, जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, सिंधुदूर्ग यांनी तांत्रिक मंजूरी प्रदान करावी.
**चांदा ते बांदा विकास योजनेंतर्गत पशुसंवर्धन विभागामार्फत राबवावयाच्या योजनांचा तपशील :-**

**१. दुग्ध उत्पादन व्यवसायासाठी प्रोत्साहित करणे :-**

**अ)** मॉडेल -१ अंतर्गत ५०० लाभार्थ्यांना वैयक्तिक स्वरुपात गोपालन करण्यासाठी अनुदान देणे.

**आ)** मॉडेल - २ अंतर्गत २० गटांना सामुहिक तत्वावर गोपालन करण्यासाठी अनुदान देणे.

**युनिट कॉस्ट आणि एकुण आवश्यक निधी**

**मॉडेल १ वैयक्तिक स्वरुपात ०२ देशी दुधाळ गायींचे संगोपन करणे**

| बाब | परिगणना सूत्र | रक्कम (रु.) |
|---|---|---|
| शुध्द गीर / शुध्द साहीवाल जातीच्या २ गाई | २ X रु. ६०,०००/- | १,२०,०००/- |
| वाहतूक खर्च | प्रति गाय रु.१६,०००/- | ३२,०००/- |
| विमा खर्च | देशी गाईच्या किमतीच्या ४ टक्के + १८ टक्के जीएसटी | ६,०००/- |
| ०२ दुधाळ गाई व वासरे यांचेसाठी २०० चौ. फूट बंधीस्त गोठा आणि ३०० चौ. फूट मुक्त संचार पध्दतीची जागा यानुसार एकूण ५०० चौ. फूट मुक्त संचार गोठा स्थानिक साहित्य उपलब्ध करुन बांधणे | रु. ५०,०००/- च्या मर्यादेत | ५०,०००/- |
| | **एकूण** | **२,०८,०००/-** |

**मॉडेल २ सामुहिक तत्वावर ५० देशी गाईचे संगोपन करणे**

| बाब | परिगणना सूत्र | रक्कम (रु.) |
|---|---|---|
| शुध्द गीर / शुध्द साहीवाल जातीच्या गाई | ५० X रु. ६०,०००/- | ३०,००,०००/- |
| वाहतूक खर्च | प्रति गाय रु.१६,०००/- | ८,००,०००/- |
| विमा खर्च | किमतीच्या ४ टक्के + १८ टक्के जीएसटी | १,४१,६००/- |
| ५० दुधाळ गाई व ३० वासरे यांचेसाठी ६,५०० चौ.फूट बंधीस्त गोटा आणि ८,००० | ६,५०,०००/- च्या मर्यादेत | ६,५०,०००/- |

<table>
<tr><td rowspan="2"></td><td>चौ.फूट मुक्त संचार पध्दतीची जागा यानुसार एकूण १४,५०० चौ.फूट मुक्त संचार गोटा स्थानिक साहित्य उपलब्ध करुन बांधणे</td><td></td><td></td></tr>
<tr><td></td><td>एकूण</td><td>४५,९१,६००/-</td></tr>
<tr><td></td><td colspan="3">लाभार्थींचे प्रशिक्षण :<br>अ) ट्रेनर्स ट्रेनिंग :- वरील दोन्ही प्रस्तावित मॉडेल्स मध्ये लाभार्थींना प्रशिक्षण देणे आवश्यक आहे. हे प्रशिक्षण शक्यतो तालुका स्तरावर ३ दिवस मुदतीचे देण्यात यावे. लाभार्थींना प्रशिक्षण देण्यासाठी प्रशिक्षीत व्यक्ती / स्थानिक माहितगार व्यक्तींना प्रशिक्षण देऊन त्यांचा रिसोर्स पर्सन म्हणून उपयोग करुन घ्यावा.<br>एकूण १,००० लाभार्थींना प्रशिक्षण देण्यासाठी ५० स्थानिक व्यक्ती / गोपालन करीत बसलेल्या व्यक्तींना ट्रेनर्स ट्रेनिंग देण्यात यावे. बायफ या महाराष्ट्र ग्रामीण जीवन उन्नत्ती अभियानामध्ये नोंदणीकृत सेवाभावी संस्थेव्दारे पुणे येथे असे १४ दिवस मुदतीचे ट्रेनर्स ट्रेनिंग आयोजित करुन प्रशिक्षण देण्यात यावे. या प्रशिक्षणाचा खर्च प्रति प्रशिक्षणार्थी रु.१०,०००/- अपेक्षित आहे.<br><br>ब) प्रत्यक्ष लाभार्थींचे प्रशिक्षण :- प्रशिक्षित ट्रेनर्सव्दारे लाभार्थ्यांना तालुका स्तरावर ३ दिवस मुदतीचे (निवासी) आवश्यक गोपालन व्यवस्थापन आणि चारा उत्पादन विषयक प्रशिक्षण देण्यात यावे. याचा खर्च प्रति प्रशिक्षणार्थी रू.१,५५०/- नुसार (प्रति दिन रु. ५००/- X ३ दिवस + गावापासून तालुक्यापर्यंत जाण्या-येण्यासाठी बसचे भाडे रु. ५०/-)</td></tr>
</table>

उपरोक्त दोन्ही मॉडेल अंतर्गत लाभार्थ्यांची निवड संदर्भीय-३ येथील दि. ३०.१०.२०१५ च्या शासन निर्णयामध्ये नमुद केलेल्या लाभार्थी निवडीच्या निकषानुसार करण्यात यावी. या अंतर्गत सर्वसाधारण प्रवर्गातील निवडलेल्या लाभार्थ्यांसाठी ७५ टक्के शासनाचे अनुदान व उर्वरित २५ टक्के वित्तीय संस्थेचे कर्ज / लाभार्थी हिस्सा तर, अनुसूचित जाती व जमाती प्रवर्गातील निवडलेल्या लाभार्थ्यांसाठी ९० टक्के शासनाचे अनुदान व उर्वरित १० टक्के वित्तीय संस्थेचे कर्ज / लाभार्थी हिस्सा राहील.

**२. १० शेळया + ०१ बोकड असा शेळी गट वाटप करणे:-**

| | |
|---|---|
| **योजनेचे स्वरुप युनिट कॉस्ट आणि एकुण आवश्यक निधी** | लाभार्थींना कोकण कन्याल, उस्मानाबादी, मलबेरी, स्थानिक हवामानात तग धरणाऱ्या अशा जातींपैकी कोणत्याही एका जातीच्या एक वर्ष वयावरील १० शेळ्या आणि त्याच जातीचा एक बोकड ५०/७५ टक्के अनुदानावर पुरवठा करणे. या युनिटचा विमा उतरविण्यात यावा. लाभार्थींनी शेळी पालन व्यवसाय किमान ३ वर्षे करणे आवश्यक राहील. तसे बंधपत्र लाभार्थीला करुन द्यावे लागेल. कळपातील नरांची दोन वर्षांनी आदलाबदल करुन घेणे आवश्यक राहील, जेणेकरुन इन-ब्रिडिंग चा धोका राहणार नाही. |

| बाब | परिगणना सुत्र | रक्कम (रुपये) |
|---|---|---|
| कोकण कन्याल, उस्मानाबादी, स्थानिक हवामानात तग धरणाऱ्या अशा जातींपैकी कोणत्याही एका जातीच्या १० शेळ्या + १ बोकड | १० X रु. ६,०००/-<br>०१ X रु. ७,०००/- | ६७,०००/- |
| गटाचा ३ वर्षासाठी विमा | रु.६७,००० X ४ % = रु.२,६८० + १८% जीएसटी X ३ वर्षे यावर १५ % डिस्काऊंट | ८,०००/- |
| बांबूचा वाडा २४० चौ. फुट बांधकाम | रु. ८० प्रती चौ. फुट | १९,२००/- |
| | एकूण | ९४,२००/- |
| | | |

**लाभार्थींचे प्रशिक्षण :**

**अ) ट्रेनर्स ट्रेनिंग** - उपरोक्त योजनेच्या यशस्वी अंमलबजावणीसाठी लाभार्थींना तालुका स्तरावर ३ दिवस मुदतीचे प्रशिक्षण देणे आवश्यक आहे. लाभार्थींना प्रशिक्षण देण्यासाठी प्रशिक्षित व्यक्ती / स्थानिक माहितगार व्यक्तींना प्रशिक्षण देऊन त्यांचा रिसोर्स पर्सन म्हणून उपयोग करुन घेण्यात यावा.

एकूण ४२५ लाभार्थींना प्रशिक्षण देण्यासाठी १० स्थानिक व्यक्ती / शेळी पालन करीत असलेल्या व्यक्तींना ट्रेनर्स ट्रेनिंग देण्यात यावे. बायफ या महाराष्ट्र ग्रामीण जीवन उन्नत्ती अभियानामध्ये नोंदणीकृत सेवाभावी संस्थेव्दारे पुणे येथे असे १४ दिवस मुदतीचे ट्रेनर्स ट्रेनिंग आयोजित करुन प्रशिक्षण देण्यात यावे. या प्रशिक्षणाचा खर्च प्रति प्रशिक्षणार्थी रु.१०,०००/- अपेक्षित आहे.

**ब) प्रत्यक्ष लाभार्थींचे प्रशिक्षण -**

प्रशिक्षित ट्रेनर्सव्दारे लाभार्थ्यांना तालुका स्तरावर ३ दिवस मुदतीचे निवासी शेळी पालन व्यवस्थापन आणि चारा उत्पादन विषयक प्रशिक्षण देण्यात यावे. याचा खर्च प्रति प्रशिक्षणार्थी रु.१,५५०/- नुसार प्रतिदिन रु.५००/- x ३ दिवस + गावापासून तालुक्यापर्यंत जाण्या-येण्यासाठी बसचे भाडे रु.५०/- इतका देय आहे.

या योजनेंतर्गत लाभार्थ्यांची निवड संदर्भीय-४ येथील दि. ०२.०७.२०११ च्या शासन निर्णयामध्ये नमुद केलेल्या लाभार्थी निवडीच्या निकषानुसार करण्यात यावी. या अंतर्गत सर्वसाधारण प्रवर्गातील निवडलेल्या लाभार्थ्यांसाठी ७५ टक्के शासनाचे अनुदान व उर्वरित २५ टक्के वित्तीय संस्थेचे कर्ज / लाभार्थी हिस्सा तर, अनुसूचित जाती व जमाती प्रवर्गातील निवडलेल्या लाभार्थ्यांसाठी ९० टक्के शासनाचे अनुदान व उर्वरित १० टक्के वित्तीय संस्थेचे कर्ज / लाभार्थी हिस्सा राहील.

## ३. महिला बचत गट सदस्यांसाठी कुक्कुट ग्राम योजना:-

<table>
<tr>
<td>योजनेचे स्वरुप युनिट कॉस्ट आणि एकुण आवश्यक निधी</td>
<td>
एका महिला समुह गटातील १० लाभार्थी महिलांना प्रत्येकी १०० एक दिवसीय कुक्कुट पिले, पहिल्या ६ आठवड्यांसाठी खाद्य, खाद्य व पाण्याची भांडी, रात्रीचा निवारा व संरक्षित स्कॅव्हेंजिंग निश्चितीसाठी जाळी, औषधे व लसमात्रा इ. पायाभुत बाबींसाठी प्रत्येक महिला लाभार्थीला रु. १०,०००/- अनुदान खालीलप्रमाणे देय राहील.
<table>
<tr><th>बाब</th><th>परिगणना सुत्र</th><th>रक्कम (रुपये)</th></tr>
<tr><td>१०० पिले (लाभार्थ्यांच्या पसंतीनुसार व उपलब्धतेनुसार आर आय आर / ब्लॅक ॲस्ट्रोलार्प / कावेरी / कॅरी शामा / कॅरी निर्भिक / कलिंगा ब्राऊन / इंड ब्रो ब्राऊन लेअर / गिरिराज ई. पैकी कोणत्याही एका जातीची )</td><td>१०० X रु. २२/-</td><td>२,२००/-</td></tr>
<tr><td>प्रती पक्षी ६ आठवडयांसाठी एकूण २ किलो खाद्य</td><td>२ किलो x १०० x रु.२३/-</td><td>४,६००/-</td></tr>
<tr><td>रात्रीचा निवारा आणि स्कॅव्हेंजिंग जागा तयार करण्यासाठी जाळी</td><td>स्थानिक साहित्य वापरुन रु. २,०००/-</td><td>२,०००/-</td></tr>
<tr><td>खाद्य व पाण्याची भांडी<br>प्रत्येकी २ चिक फिडर व चिक ड्रिंकर<br>प्रत्येकी १ ॲडल्ट फिडर व ॲडल्ट ड्रिंकर</td><td>रु.१,१००/- च्या मर्यादेत</td><td>१,१००/-</td></tr>
<tr><td>औषधे आणि लसमात्रा</td><td>रु.१०० /- च्या मर्यादेत</td><td>१००/-</td></tr>
<tr><td colspan="2" align="right">एकूण</td><td>१०,०००/-</td></tr>
</table>
१) या प्रमाणे एका १० महिलांच्या समुह गटाला रु. १.०० लक्ष अनुदान देय आहे.<br>
२) अशा ४० समुह गटांचा एक क्लस्टर (कुक्कुट ग्राम) तयार करुन एका तालुक्यात एका कुक्कुट गामासाठी रु.४०.०० लक्ष अनुदान देय आहे.<br>
३) यानुसार टप्प्या टप्प्याने संपूर्ण सिंधुदूर्ग जिल्हयात योजना राबविण्यात यावी. कुक्कुट ग्राम स्थापन करण्यासाठी प्रति कुक्कुट ग्राम रु. ४०.०० लक्ष अनुदान यानुसार तरतुदीच्या उपलब्धतेनुसार जिल्हयात कुक्कुट ग्राम स्थापन करण्यात यावेत.<br>
४) स्थापन होणा-या कुक्कुट ग्रामांमधील सर्व महिला लाभार्थ्यांना महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवन उन्नत्ती अभियान- उमेद वा तत्सम संस्था यांचेकडून तालुका स्तरावर ३ दिवस मुदतीचे आवश्यक निवासी कुक्कुट पालन प्रशिक्षण देण्यात यावे. याचा खर्च प्रति प्रशिक्षणार्थी रु. १,५५०/- नुसार (प्रति दिन रु. ५०० /- x ३ दिवस + गावापासून तालुक्यापर्यत जाण्या- येण्यासाठी बसचे भाडे रु. ५०/-) एकूण रु. ७४.४० लक्ष इतका अपेक्षित आहे.<br>
५) व्यावसायिक इंटिग्रेटरव्दारे सदर कुक्कुट पक्ष्यांना ७ व्या आठवडयापासून ७२ आठवडे पूर्ण होईपर्यंत खाद्य पुरवठा करणे, उत्पादित अंडी बायबॅक करणे आणि लाभार्थ्यांना
</td>
</tr>
</table>

| | |
|---|---|
| | अंडयांच्य पेमेंट मधून खाद्याची रक्कम कापून घेणे या प्रकारे या योजनेची सांगड घालण्यात यावी.<br>६) यासाठी जिल्हा स्तरावर इच्छापत्र मागवून व्यावसायिक इंटिग्रेटरची निवड करण्यात यावी.<br>७) सदर इंटिग्रेटरने स्वत: किंवा अन्य संस्थेच्या माध्यमातून आवश्यकतेनुसार मध्यवर्ती ठिकाणी कुक्कुट खाद्य तयार करण्यासाठी खाद्य निर्मिती युनिट उभारावे. या युनिटची क्षमता किमान ४० मे.टन प्रति दिन असावी.<br>८) तालुका येथे सघन कुक्कुट विकास गट या योजनेंतर्गत कार्यान्वीत झालेल्या हॅचरीजशी सदर योजनेची सांगड घालून १ दिवसीय कुक्कुट पिले तेथून उपलब्ध करुन घेण्यात यावीत. त्याचप्रमाणे शासकीय आणि खाजगी हॅचरीजमधून देखील पिले उपलब्ध करुन घ्यावीत.<br>९) इंटिग्रेटरने या योजनेमध्ये उत्पादित होणारी अंडी **हॅपी हेन एग्ज ऑरगॅनिक एग्ज** म्हणून ब्रॅंड प्रस्थापित करुन विदेशात किंवा प्रस्थापित मोठया बाजारांमध्ये विक्रि करावीत. |

महिला समुह गटातील लाभार्थींची निवड संबंधित समुह गटानेच करावी. ज्या महिलांना कुक्कुट पिले दिली जातील त्यांनी कुक्कुट पालन प्रशिक्षण घेणे बंधनकारक राहील. ज्यांनी आधी कोंबडया पाळल्या आहेत, अशा महिलांना प्राधान्य द्यावे. लाभार्थी महिलेकडे १०० पिले संगोपन करण्यासाठी आवश्यक जागा उपलब्ध असावी. तसेच सुरुवातीस दीड महिने कालावधीत मर्यादित जागेत परस कुक्कुटपालन करण्यासाठी घराभोवती किमान ५०० ते ७५० चौ.फूट मोकळी जागा उपलब्ध असावी.

या अंतर्गत सर्वसाधारण प्रवर्गातील निवडलेल्या लाभार्थ्यांसाठी ७५ टक्के शासनाचे अनुदान व उर्वरित २५ टक्के वित्तीय संस्थेचे कर्ज / लाभार्थी हिस्सा तर, अनुसूचित जाती व जमाती प्रवर्गातील निवडलेल्या लाभार्थ्यांसाठी ९० टक्के शासनाचे अनुदान व उर्वरित १० टक्के वित्तीय संस्थेचे कर्ज / लाभार्थी हिस्सा राहील.

उपरोक्त तिनही योजना चांदा ते बांदा विकास योजनेअंतर्गत सिंधुदुर्ग जिल्ह्यासाठी उपलब्ध होणा-या निधीच्या अधिन राहून राबविण्यात याव्यात.

उपरोक्त योजनांच्या अंमलबजावणीसाठी आयुक्त पशुसंवर्धन यांनी त्याच्या स्तरावरुन सविस्तर मार्गदर्शक सूचना सर्व संबंधितांना निर्गमित कराव्यात.

हा शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेताक २०१८१२१३१७२९४९७०१ असा आहे. सदर शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Vijay K. Chaudhari
Date: 2018.12.13 17:43:54 +05'30'

**( विजय चौधरी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. मा. राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, औध, पुणे.
४. जिल्हाधिकारी, सिंधुदूर्ग
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सिंधुदूर्ग.
६. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
७. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
८. व्यवस्थापकीय संचालक, पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ, गोखलेनगर, पुणे.
९. प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन कोकण विभाग गोरेगाव, मुंबई ६५.
१०. जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त सिंधुदूर्ग
११. जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद, सिंधुदूर्ग
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, सिंधुदूर्ग
१३. अवर सचिव, पदुम-३,कक्ष अधिकारी पदुम-१/१६, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. निवड नस्ती (पदुम-४).